**राज्यातील शासकीय धान्य गोदामातील शिल्लक बारदानाची विल्हेवाट लावण्याबाबतची कार्यपध्दती निश्चित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : विल्हेवा-३०१८/प्र.क्र.६४/ना.पु.१६-अ,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : १० ऑक्टोबर, २०१८

<u>वाचा</u> : (१) शासन निर्णय क्रमांक : गनिज १०९९/२०४४/प्र.क्र. ४७९०/ना.पु.१६-अ, दि. १२ नोव्हेंबर, १९९९.
(२) शासन परिपत्रक क्रमांक: गनिज १००१/२२३३/प्र.क्र.५२३२/ना.पु.१६-अ, दि. २१ नोव्हेंबर, २००२.
(३) शासन परिपत्रक क्रमांक: गनिज १००६/४१०/प्र.क्र.४४३/ना.पु.१६-अ, दि. २३ एप्रिल, २००७.

**प्रस्तावना :-**

सार्वजनिक वितरण व्यवस्था व इतर योजने अंतर्गतच्या धान्याचे शासकीय गोदामात प्रमाणिकरण केल्यानंतर शिल्लक राहिलेल्या बारदानाची विल्हेवाट लावण्यात येते. बारदानाची विल्हेवाट लावतांना संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयानुसार बारदानाची हातची किंमत निश्चित करण्यात येते. मात्र हातची किंमती ही जिल्हास्तरावर निश्चित करीत असतांना दोन जवळ जवळच्या जिल्ह्यांमध्ये हातची किंमत ठरवितांना त्यात फरक येत असल्याचे निदर्शनास आले आहे. काही जिल्ह्यांमध्ये अत्यंत कमी तर काही जिल्ह्यांमध्ये फार जास्त हातची किंमत ठरविली जाते. त्याचप्रमाणे बऱ्याच जिल्ह्यांमध्ये वेळीच बारदानाची विल्हेवाट लावली जात नसल्याचे निदर्शनास आले आहे. बारदानाची वेळीच विल्हेवाट न लावल्यामुळे बारदानाची प्रत खालावते व त्यास योग्य किंमत मिळत नाही. पर्यायाने शासनास आर्थिक नुकसान सोसावे लागते. यास्तव बारदानाच्या विल्हेवाटीत सुसूत्रता आणण्यासाठी नव्याने कार्यपध्दती निश्चित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

राज्यातील शासकीय धान्य गोदामातील बारदानाची विल्हेवाट लावण्याबाबत निर्गमित करण्यात आलेला संदर्भिय शासन निर्णय व परिपत्रके या शासन निर्णयान्वये अधिक्रमित करण्यात येत असून राज्यातील शासकीय गोदामांमध्ये प्रमाणिकरणानंतर शिल्लक राहणाऱ्या बारदानाची योग्यरितीने विल्हेवाट

लावून शासनास अशा बारदानाच्या विक्रीतून जास्तीत जास्त रक्कम मिळावी म्हणून खाली नमूद केलेल्या पध्दतीचा अवलंब करुन बारदानाची विल्हेवाट लावण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे.

२. **बारदान विल्हेवाटीबाबत अनुसरावयाची कार्यपध्दती:-**

२.१ **बारदानाचे वर्गीकरण:-** तालुकानिहाय गोदाम व्यवस्थापकांनी शासकीय गोदामातील शिल्लक असलेल्या बारदानाचे वर्गीकरण खालील निर्देशानुसार प्रत्येक महिन्याच्या शेवटच्या दिवशी करणे आवश्यक आहे.

**अ) वापरण्या योग्य (उपयोगी) :-** ज्या गोणी थोडया प्रमाणात फाटलेल्या असतील अथवा ज्या गोणीची शिवण काही ठिकाणी उसविलेली असेल व अशा शिवलेल्या गोणीत धान्य व्यवस्थित सामावू शकत असेल तर त्या गोण्या पुन्हा वापरण्यास योग्य (Servicable) या सदरात वर्गीकृत कराव्यात.

**ब) वापरण्यास अयोग्य (निरुपयोगी) :-** ज्या गोणीचे आकारमान इतर चांगल्या गोणीसारखेच असेल परंतु त्या अति प्रमाणात फाटल्यामुळे शिवूनही पुन्हा धान्यासाठी वापरण्यास येण्यासारख्या नसतील तर त्या गोणी पुन्हा वापरण्यास अयोग्य (Unservicable) या सदरात वर्गीकृत कराव्यात.

**क) तुकडा :-** ज्या गोणीचे आकारमान देखील गोणीसारखे नसेल व ज्या गोणी अतिजीर्ण झाल्यामुळे त्याचे केवळ तुकडे राहत असतील, अशा गोणी तुकडे झालेल्या गोणी (SCrap) या सदरात वर्गीकृत कराव्यात.

२.२ वरील २.१ मध्ये विनिर्दिष्ट केलेल्या वर्गीकरणाचे काम हे अन्न लेखा नियम पुस्तिकेत नमूद केल्याप्रमाणे तालुक्यातील गोदाम व्यवस्थापक/ संबंधित नायब तहसिलदार यांनी प्रत्येक महिन्याच्या शेवटी वर्गीकरण करावयाचे वर्गीकरणाचे प्रमाणपत्र अभिलेख्यावर ठेवावे. सहाय्यक जिल्हा पुरवठा अधिकारी यांनी वर्गीकरणाच्या कार्यवाहीचे वेळोवेळी तपासनी करावी.

२.३ **बारदान विल्हेवाटीचे अधिकार:-** उपयोगी, निरुपयोगी व तुकडा बारदान्याचे विल्हेवाटीसंबंधी विभागीय आयुक्त, जिल्हाधिकारी व संचालक, नागरी पुरवठा (गो/वा), मुंबई यांना वित्तीय अधिकार प्रदान करण्यात आले आहेत. प्रदानित केलेल्या वित्तीय अधिकारात बारदानाची विल्हेवाट लावण्यास सदर अधिकारी सक्षम आहेत.सदर अधिकाऱ्यांना प्रदानित केलेल्या वित्तीय अधिकारात बारदानाची विल्हेवाट लावणे शक्य नसेल अशा वेळी जिल्हाधिकारी यांनी मुळ कागदपत्रांसह प्रस्ताव आयुक्तांकडे पाठवावा. विभागीय आयुक्तांना प्रदानित केलेल्या वित्तीय मर्यादापेक्षा अधिक रकमेचे प्रस्ताव आयुक्तांनी योग्य ते समर्थन करुन सर्व मुळ कागदपत्रांसह शासनाकडे पाठवावेत. तसेच संचालक, नागरी पुरवठा (गो/वा), मुंबई यांनीही समर्थन करुन मुळ कागदपत्रांसह प्रस्ताव शासन

मंजुरीस्तव पाठवावा.शासनाकडे प्रस्ताव सादर करीत असताना परिशिष्ट-अ मध्ये दर्शविलेल्या तपासणी सूचीमध्ये (चेक लिस्ट ) प्रस्तावासंबंधीची माहिती भरुन पाठविण्यात यावी.

२.४ **बारदान विल्हेवाटीचा कालावधी:-** जिल्हाधिकारी यांनी प्रत्येक वर्षीच्या सुरुवातीला जानेवारी ते एप्रिल या महिन्यात मागील वर्षीच्या बारदानाची विल्हेवाट लावणे आवश्यक राहिल. बारदाने फार मोठ्या प्रमाणात साठत आहेत, असे आढळून आल्यास बारदान्याची विक्री वर्षातून एकापेक्षा अधिकवेळा करण्यास हरकत नसावी.

२.५ **बारदानाची हातची किंमत निश्चित करणे:-** बारदानाची हातची किंमत ही यापुढे जिल्हानिहाय न ठरविता महसुली विभागानुसार ठरवावी. सदरची हातची किंमत ही त्या त्या विभागातील उप आयुक्त (पुरवठा) यांनी दरवर्षी निश्चित करावी. त्यांनी निश्चित केलेली हातची किंमत ही महसुली विभागातील सर्व जिल्ह्यांना वर्षभर लागू राहिल.

उप आयुक्त (पुरवठा) यांनी हातची किंमत ठरविण्याची कार्यवाही डिसेंबर महिन्याच्या सुरुवातीपासून सुरु करावी व डिसेंबर महिन्याच्या तिसऱ्या आठवड्यात हातची किंमत (Upset Price) घोषित करावी. हातची किंमत निश्चित करण्यासाठी विभागातील प्रत्येक जिल्ह्यातील स्थानिक बाजारातील बारदान्याची घाऊक किंमत व मागील वर्षी प्रत्येक जिल्ह्यात बारदान विक्रीद्वारे आलेली किंमत विचारात घेऊन हातची किंमत निश्चित करावी.

३. बारदानाची निविदा पध्दतीने विल्हेवाट लावण्यापुर्वी ठराविक मुदत देऊन महाराष्ट्र स्टेट को-ऑपरेटिव्ह कन्झ्युमर्स फेडरेशन, आदिवासी विकास महामंडळ व भारतीय खाद्य निगम यांना बारदानाची आवश्यकता आहे किंवा कसे, याबाबत डिसेंबर महिन्याच्या शेवटच्या आठवडयात लेखी विचारणा करण्यात यावी. त्याचप्रमाणे त्यांच्याशी प्रत्यक्ष चर्चा करुन त्यांना बारदानाची आवश्यकता असल्यास त्यांच्या प्रधान कार्यालयाकडून त्याबाबत लेखी घ्यावे व त्यांना निश्चित केलेल्या हातच्या किंमतीनुसार (Upset Price) बारदाने उपलब्ध करुन दयावीत. मात्र त्यांनी बारदानाची आवश्यकता नसल्याचे लेखी कळविल्यावर अथवा दिलेल्या मुदतीत त्यांनी काहीही न कळविल्यास बारदान्याची निविदा पध्दतीने विल्हेवाट लावावी.

४. **निविदा प्रक्रिया राबविण्याची पध्दत व जबाबदारी:-**

४.१ जिल्ह्यातील शासकीय गोदामातील उपयोगी, निरुपयोगी व तुकडा बारदान्याच्या विल्हेवाटीसाठी खुली ई-निविदा प्रकिया जिल्हास्तरावर जिल्हाधिकारी यांच्याकडून राबविण्यात येईल.

४.२ शिल्लक बारदाना विक्रीसाठी सामान्य प्रशासन विभाग (माहिती व तंत्रज्ञान संचालनालय ) यांच्या सन निर्णय क्रमांक मातंसं/नस्ती २०१२/ प्र.क्र.२७३/३९, दिनांक २६ नोव्हेंबर, २०१४, शासन निर्णय क्र. ०८०/०६/२०१३ DIR-DIT(MH)/३९ ,दि . ०३ डिसेंबर ,२०१४ उद्योग , ऊर्जा व कामगार विभाग शासन निर्णय क्र. भांखस -२०१४/प्र. क्र. ८२ /भाग-III / उद्योग-४,दि ०१ डिसेंबर,२०१६ मधील सुचनानुसार कार्यवाही करण्यात यावी.निविदा प्रक्रिया/दरपत्रके पध्द्ती राबविण्याबाबत ज्या तरतुदी विहित केल्या आहेत त्या तरतुदी आणि त्यामध्ये वेळोवेळी होणारा बदल लक्षात घेऊन कार्यवाही करण्यात यावी. सद्यस्थितीमध्ये उपल्ब्ध तरतुदीनुसार रु. १ लाख व त्यापेक्षा जास्त हातची किंमत येत असल्यास ई-निविदा / ई-लिलाव पध्द्तीचा वापर करणे बंधनकारक राहील. अन्यथा दरपत्रक पध्द्तीचा वापर करता येईल.

४.३ निविदा प्रक्रिया पूर्ण करण्याची जबाबदारी जिल्हाधिकारी/ संचालक, नागरी पुरवठा यांची असून उद्योग , ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय ,दि ०१ डिसेंबर,२०१६ मधील २.९.४ नुसार गठीत करण्यात आलेल्या जिल्हा स्तरीय खरेदी समितीने सदर शासन निर्णय क्र.०४ मधिल विहित तरतुदीनुसार अनुज्ञेय कर भरणे बंधनकारक असल्याचे निविदेत स्पष्ट करण्यात यावे.

४.४ दर मंजुर करताना निविदाकाराची मक्तेदारी असणे, तीनपेक्षा कमी निविदा प्राप्त झाल्यामुळे , स्पर्धेचा अभाव असणे निविदाकारांनी कार्टेल तयार करणे इ. बाबींमुळे दर कमी आलेले नाहीत याची सदर समितीने खात्री करुन तसा अभिप्राय नोंदवावा व हे दर मार्केट दरापेक्षा कमी नसल्याची खात्री करुन ध्यावी. प्राप्त निविदांपेकी ज्या निविदाकाराने सर्व शिल्ल्क बारदाना साठी एकत्रितरित्या जास्त दर दिले असतील ती निविदा मंजूर करावी. बारदान्याच्या विल्हेवाटीतून अधिक दर मिळण्यासाठी H-१ निविदाकाराशी वाटाघाटी कराव्यात.

४.५ **इसारा रक्कम**:- बारदानाच्या हातच्या एकुण किंमतीच्या २% इतकी इसाऱ्याची रक्कम विक्रीच्या पध्द्तीनुसार ऑनलाईन / ऑफ़लाईन भरणे बंधनकारक राहील.मंजूर निविदाकाराव्यतिरीक्त उर्वरित निविदाकारांची इसारा रक्क्म ऑफ़लाईन स्विकारली असल्यास ऑफ़लाईन परत करण्यात यावी व ऑनलाईन स्विकारली असल्यास त्यासाठी Auto Refund हा पर्याय स्विकारावा.ज्यांनी इसारा रक्कम भरलेली असेल, त्यंना निविदा प्रक्रियेमध्ये भाग घेणे बंधनकारक आहे. निविदा प्रक्रियेमध्ये भाग न घेतल्यास अथवा घेऊन कार्यवाही अर्पूण ठेवल्यास त्यांची इसाऱ्याची संपूर्ण रक्कम (ऑनलाईन प्रकारामध्ये त्याच दिवशी ) जप्त करण्यात यावी.कोणत्याही कारणास्तव रक्कम जप्त करावयाची असल्यास रक्कम जप्त करावयाची कार्यवाही ऑनलाईन प्रकारामध्ये त्याच दिवशी

पूर्ण करण्यात यावी अन्यथा रक्कम Auto Refund होईल. ऑफ़लाईन प्रकारामध्ये प्रचलीत पध्दतीनुसार रक्कम जप्त करण्यात यावी.

४.६ **अनामत रक्कम**:- निविदेचा निकाल अधिसूचित करण्यात आल्यानंतर, मंजूर निविदाकाराने ७ दिवसांच्या आत करारनामा करुन उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या दि ०१ डिसेंबर, २०१६ रोजीच्या शासन निर्णयासोबतच्या नियमपुस्तिकेमधिल परिच्छेद क्र. ४.६ मधील तरतूदीनुसार खरेदी मुल्याच्या ३% इतकी रक्कम धनाकर्षाव्दारे/बँकेच्या हमीद्वारे जिल्हाधिकारी यांचे नावे जमा करावी. अनामत रक्कमेवर कोणतेही व्याज देय राहणार नाही.

**४.७** मंजूर निविदाकाराकडुन (H-१) दिलेल्या मुदतीत उचल न झाल्यास अथवा सदर निविदाकाराने निविदेतील अटी /शर्तींचा भंग केल्यास त्याची अनामत रक्कम जप्त करुन सदर निविदाकरास प्रतिबंधित करण्यात यावे. अशा वेळी H-१ यांनी दिलेल्या दरानुसार सदर बारदानाची उचल करण्याकरता H-२ या निविदाकारास विचारणा करण्यात यावी.H-२ या निविदाकाराने नकार दिल्यास निविदा प्रक्रिया रद्द करण्यात यावी.

**५. निविदाकाराच्या जबाबदाऱ्या:-**

५.१ ई निविदा/लिलाव करावयाच्या बारदाना निविदाधारकास संबधित गोदामामध्ये कामाच्या दिवशी व कार्यालयीन वेळेत पहावयास मिळेल.

५.२ सदर बारदानाचा साठा संबंधित गोदामातून ज्या ठिकाणी आहे तेथून स्वखर्चाने उचलावा लागेल. कोणत्यही परिस्थितीत बारदाना निवडून घेता येणार नाही.

५.३ एखादा बारदाना हा उपयोगी, निरुपयोगी किंवा तुकडा आहे किंवा कसे हे ठरविण्याचे अधिकार संबंधित तालुक्याचे तहसिलदार यांना राहील.या बाबतीत त्यांचा निर्णय अंतिम राहील व त्यानुसार बारदानाची उचल यशस्वी निविदाधारकास बंधनकारक राहील.

५.४ निविदाकाराने निविदेमध्ये कोणत्याही प्रकारची अट नमूद करु नये.

५.५ निविदाकाराने निविदेमध्ये स्वतःचे नाव, फ़र्मचे नाव, पत्ता, ई-मेल, दूरध्वनी क्र. नमूद करावे. सोबत सादर करावयाच्या तांत्रिक लिफ़ाफ़्यामध्ये संस्था /फ़र्म असल्यास नोंदणी क्र.,पॅन कार्ड क्र., आयकर किंवा GST करदाता असल्यास तसे प्रमाणपत्र, GST क्र. इ. बाबींची पूर्तता करणे आवश्यक राहील. अन्यथा, निविदा नाकारली जाईल.

५.६ तांत्रिक लिफ़ाफ़्यामध्ये आवश्यक कागदपत्रांची पूर्तता करणाऱ्या निविदाकाराचाच लिफ़ाफ़ा उघड्ण्यात येईल.

५.७ निविदा फ़ी रु. ५००/- व बारदानाच्या हातच्या एकुण किंमतीच्या २ % इतकी इसाऱ्याची रक्कम भरणे बंधनकारक राहील निविदा फ़ी परत केली जाणार नाही.

५.८ निविदा मंजूर होणाऱ्या यशस्वी निविदाधारकास मंजूर आदेश प्राप्त झाल्यापासुन सात दिवसांच्या आत करारनामा करुन त्यानंतर ३० दिवसात संपूर्ण बारदानाची उचल करणे आणि शासनाचे प्रचलित करविषयक अधिनियमातील तरतुदीनुसार अनुज्ञेय कर भरणे बंधनकारक राहील.

५.९ कोणत्याही कारणास्तव बारदानाची किंमत हप्त्याने भरण्याची मुभा दिली जाणार नाही किंवा तशी विनंती यशस्वी निविदाकारास करता येणार नाही. करारनामा केल्यानंतर व पुर्ण रक्कमेचा भरणा केल्यानंतर बारदाना उचलीचे आदेश दिले जातील. एकदा भरणा केलेली रक्कम कोणत्याही कारणास्तव परत केली जाणार नाही.

५.१० यशस्वी निविदाकाराने बारदानाची उचल केल्यानंतर बारदाना ताब्यात घेतल्यानंतर त्यात नुकसान झाल्यास त्याची जबाबदादी शासनाची राहणार नाही. एकदा बारदान्याची उचल केल्यानंतर अथवा ताब्यात घेतल्यानंतर कोणत्याही कारणास्तव बारदाना परत घेतला जाणार नाही.

५.११ वित्तीय अधिकारानुसार जर निविदा मंजुरीची बाब ही वि. आयुक्त अथवा शासनाच्या अधिकार क्षेत्रातील असल्याने किंवा इतर प्रशासकीय कारणाने वि.आयुक्त / शासन स्तरावरुन निविदा मंजूरीस विलंब झाला त्यादरम्यान बारदानाची प्रत खराब झाली तर यशस्वी निविदाकाराचे मंजूर दरात कपात केली जाणार नाही. मंजूर मुळ दरावर किंमत भरणा करावी लागेल. निविदा काढल्यापासून ती मंजूर होईपर्यंत उपरोक्त कारणाने होणाऱ्या विलंबामुळे त्या दरम्यान बारदानाची प्रत खराब झाली तरीही ती जबाबदारी शासनावर राहणार नाही.

६. कोणतीही निविदा मंजूर करण्याचे अथवा नाकारण्याचे अधिकार जिल्हाधिकारी यांना व प्रकरणपरत्वे आयुक्त / शासनाने राखून ठेवलेले आहेत.

७. निविदेतील अटी व शर्तीसबंधी, बारदाना उचलीबाबत करारनामा संबंधी काही वाद निर्माण झाल्यास प्रकरण अंतिम निर्णयासाठी शासनाकडे सोपविण्यात येईल व अशा प्रकरणी शासनाचा निर्णय अंतिम राहील आणि तो यशस्वी निविदाकारास बंधनकारक राहील.

शासनाच्या निर्णयाआधी यशस्वी निविदाकारास उक्त वाद प्रकरणी दिवाणी न्यायालयात दावा दाखल करता येणार नाही.

८. **विहित कालावधीत बारदानाची विल्हेवाट न लावल्यास करावयाची कारवाई:-** राज्यातील शासकीय गोदामातील शिल्लक बारदानाची विक्री दरवर्षी न करता अनेक वर्ष बारदान साठवून त्यानंतर विक्री करण्यात येते. बारदानाची वेळीच विल्हेवाट न लावल्यामुळे बारदानाची प्रत खालावते व त्यास योग्य किंमत मिळत नसल्याने शासनाचे आर्थिक नुकसान होते. काही प्रकरणी हातच्या किंमतीपेक्षा कमी किंमत प्राप्त होते. यास्तव परि. २.४ मध्ये नमूद करण्यात आलेल्या कालावधीतच बारदानाची विल्हेवाट लावणे आवश्यक राहील. तसेच, उपाआयुक्त (पुरवठा) यांनी देखिल काटेकोरपणे वेळीच हातची किंमत निश्चित करणे आवश्यक राहील. अन्यथा, विभागीय, जिल्हा व तालुका ह्या स्तरावर वरीलप्रमाणे वेळीच कार्यवाही न झाल्यास संबंधित अधिकारी व कर्मचारी यांच्यावर जबाबदारी निश्चित करुन त्यांच्यावर कारवाई करण्यात येईल.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०१८१०१०१३२७०११३०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Satish Shridhar Supe

Digitally signed by Satish Shridhar Supe
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Food and Civil Supply, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f7773ccec10687b16ba0f2d3f7f9e6f87fe68f9b1b2cb5b73b75bab952ca0621, cn=Satish Shridhar Supe
Date: 2018.10.10 13:29:49 +05'30'

**( सतिश श्रीधर सुपे )**
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा.मंत्री, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे खाजगी सचिव
२) मा.राज्य मंत्री, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे खाजगी सचिव
३) मा. विरोधी पक्ष नेता, विधानसभा / विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
४) प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
५) सर्व विभागीय आयुक्त,
६) संचालक, नागरी पुरवठा, पुरवठा आयुक्त कार्यालय, मुंबई
७) सर्व उपायुक्त (पुरवठा), विभागीय आयुक्त, कार्यालय

८) सर्व जिल्हाधिकारी (मुंबई व मुंबई उपनगर जिल्हा वगळून)
९) सर्व जिल्हा पुरवठा अधिकारी
१०) उपसंचालक, नागरी पुरवठा, पुरवठा आयुक्तांचे कार्यालय, मुंबई.
११) उप संचालक, नागरी पुरवठा (गो/वा), मुंबई.
१२) वित्तीय सल्लागार व उपसचिव, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई.
१३) महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
१४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
१५) महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.
१६) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर.
१७) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, नागरी पुरवठा, लेखा परीक्षा परिमंडळ द्वारा: वित्तीय सल्लागार व उप सचिव, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई.
१८) वित्त विभाग ( व्यय १०), मंत्रालय, मुंबई.
१९) निवड नस्ती/नापु-१६अ.